**कुणाल, आय.टी.सर्विसेस प्रा.लि., पुणे संस्थेस आदिवासी विकास विभागाकरिता वस्तू व सेवा पुरवण्याबाबत काळ्या यादीत टाकण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र.कायादी-२०२४/प्र.क्र.४५/का-७**
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: २६ मे, २०२५

**प्रस्तावना:-**

आदिवासी विकास विभागाचा शासन निर्णय दिनांक ०४/१०/२०१३ व दिनांक १०/०७/२०१३ अन्वये अनुक्रमे महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ व शबरी आदिवासी वित्त व विकास महामंडळाचे आस्थापनेवरील रिक्त पदे नामनिर्देशनाने व बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यास कुणाल, आय.टी. सर्व्हिसेस प्रा.लि., पुणे या कंपनीची निविदा स्विकृत करण्यात येऊन संस्थेशी पदभरतीबाबत करारनामा करण्यात आलेला असून दोन्ही महामंडळाकडील पदभरतीचे कामकाज संस्थेस सोपविण्यात आलेले असुन त्यानुसार पदभरती करण्यात आली होती.

२. महामंडळाकडील पदभरतीबाबत मोठ्या प्रमाणात गैरव्यवहार झाल्याच्या तक्रारी प्राप्त झाल्यामुळे भरती प्रक्रियेस प्रशासकीय कारणास्तव शासनाने स्थगिती देऊन पदभरतीबाबतची/ गैरव्यवहाराबाबतची चौकशी करणेकरीता विभागीय आयुक्त, नाशिक यांची नियुक्ती करण्यात आली. सदर समितीने केलेल्या चौकशीमध्ये सन २०१४ मधील पदभरतीमध्ये झालेली अनियमितता कुणाल, आय.टी. सर्व्हिसेस प्रा.लि., पुणे या संस्थेच्या सहभागाने व संगनमताने झाल्याचे चौकशी अहवालातील निष्कर्षावरून दिसून येते. तसेच पदभरतीमधील अनियमिततेबाबत कुणाल, आय.टी.सहिसेस प्रा.लि., पुणे या संस्थेवर एफआयआर दाखल करण्यात आला आहे. तसेच महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळ मर्या., नाशिक यांनी कुणाल, आय.टी. सर्व्हिसेस प्रा.लि., पुणे या कंपनीस काळया यादीत टाकण्याची शिफारस शासनास केली आहे. या पार्श्वभूमीवर कुणाल, आय.टी. सर्व्हिसेस प्रा.लि., पुणे या कंपनीस काळया यादीत टाकण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**३.शासन निर्णय:-**

**कुणाल, आय.टी. सर्व्हिसेस प्रा.लि., पुणे** या खाजगी कंपनी/संस्था/पुरवठादार यांना यापुढे आदिवासी विकास विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजनांकरीता शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक: भांखस-२०१४/प्र.क्र.८२/-भाग आयआयआय/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ च्या ५.२ (अ) नुसार बंदी घालण्यात येत असून, त्यांना काळ्या यादीत टाकण्यात येत आहे. या आदेशाच्या दिनांकापासून आदिवासी विकास विभागामार्फत आणि आदिवासी विकास विभागांतर्गत

येणाऱ्या सर्व क्षेत्रिय कार्यालयामार्फत आदिवासींकरीता राबविण्यात येणाऱ्या कोणत्याही योजनेचे काम या खाजगी कंपनी/संस्थेला देण्यात येणार नाही.

४. आदिवासी विकास विभागांतर्गतच्या क्षेत्रीय कार्यालयांनी या आदेशाची तात्काळ अमलबजावणी करावी.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२५०५२६१६०४४०४६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY JAGANNATH PATIL

Digitally signed by SANJAY JAGANNATH PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Tribal Development Department, 2.5.4.20=0AEF67F1B466CDA14A91421532B9A0945726BFE27ADE33F9F8E47372FBA0CAB4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0F0C94D65F6AB75FC142521D11102FA6EC890FBFC764A09F7584B7DC5741A83B, cn=SANJAY JAGANNATH PATIL
Date: 2025.05.26 16:05:18 +05'30'

**(सं.ज.पाटील)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
४) मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,
५) मा. राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) प्रधान सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) प्रधान सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
१०)आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
११) सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास,
१२) सर्व प्रकल्प अधिकारी, आदिवासी विकास,
१३) निवड नस्ती का.७.